**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या विविध योजना तसेच सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत शिधापत्रिकांचे संगणकीकरण प्रकल्पाबाबत जनजागृती - माध्यम आराखडा २०२४-२५**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**क्रमांक: संकीर्ण-२०२४/प्र.क्र.१२/२/संगणक कक्ष**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दि. १४ ऑगस्ट, २०२४

वाचा :-

१. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.मावज-२०२१/प्र.क्र.१२६/का-३४, दि.१३.०८.२०२१
२. माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई यांचे वृत्तचित्र शाखा/का-७, दि.६.०८.२०२४ च्या बैठकीचे इतिवृत्त

<u>प्रस्तावना</u> :-

राज्यात अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या विविध योजना तसेच सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत शिधापत्रिकांचे संगणकीकरण प्रकल्पाबाबत जनजागृती या उद्देशाकरिता माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत जाहिरातीद्वारे प्रसार व प्रसिध्दी करुन प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी विभागामार्फत दि.२.०८.२०२४ च्या टिप्पणीन्वये रु. ४,७२,००,०००/- जाहिरातीच्या आराखड्याचा प्रस्ताव सादर केला. त्यानुसार, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई यांनी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात राज्यात अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या विविध योजना तसेच सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत शिधापत्रिकांचे संगणकीकरण प्रकल्प अनुषंगिक प्रसिध्दी व प्रचार प्रभावीपणे करणे याकरिता रु.४,७१,८९,२००/- (अक्षरी रुपये चार कोटी एकाहत्तर लक्ष एकोणनव्वद हजार दोनशे फक्त) इतक्या रकमेच्या जाहिरात माध्यम आराखड्यास मान्यता दिली आहे.

सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१३.०८.२०२१ रोजीच्या शासन निर्णयानुसार शासकीय जाहिराती वितरण धोरणाच्या अंमलबजावणीची कार्यपध्दती विहीत करण्यात आली आहे. त्यानुसार अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या प्रचार व प्रसिध्दीसाठी सादर करण्यात आलेल्या माध्यम आराखड्यास माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या माध्यम आराखडा नियोजन व अंमलबजवणी समितीच्या दि.६.०८.२०२४ रोजी झालेल्या बैठकीत मान्यता देण्यात आलेली आहे. सदर आराखड्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासन पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये राज्यात अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या विविध योजना तसेच सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत शिधापत्रिकांचे संगणकीकरण प्रकल्प अनुषंगिक प्रसिध्दी व प्रचार प्रभावीपणे करणे यासाठी जाहिरात व प्रसिध्दीच्या माध्यमातून जनसामान्यांपर्यंत पोहचविणे या उद्देशाकरिता माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या माध्यम आराखडा नियोजन व अंमलबजवणी समितीच्या दि.६.०८.२०२४ रोजी झालेल्या बैठकीत मान्यता देण्यात आलेल्या माध्यम आराखडयास तसेच तो राबविण्यासाठी येणाऱ्या रु.४,७१,८९,२००/-(अक्षरी रुपये चार कोटी एकाहत्तर लक्ष एकोणनव्वद हजार दोनशे फक्त) (करांसहित) इतक्या खर्चास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर प्रचार व प्रसिध्दी माध्यम आराखड्यानुसार येणाऱ्या अंदाजीत खर्चाचा तपशील खालील प्रमाणे राहील :-

| माहिती व जनसंपर्क महासंचालनालय | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग ( संगणक कक्ष) प्रस्तावित माध्यम आराखडा | | | | | | | | |
| जाहिरात निर्मिती साहित्य तपशील (Production of Creative) | | | | | | | | |
| क्र. | माध्यम | स्वरुप | तपशील | रक्कम (प्रती नग) | संख्या | रक्कम (रु.) | जीएसटी (रु.) | एकूण अंदाजित रक्कम (रु.) (सर्व करांसहित) |
| १ | प्रिंट | | प्रिंट आणि इतर बाह्य माध्यमांकरिता जाहिरातीचा मजकूर (Adaptation, Translation, Formating from one media to other media) | १०,००० | ३ | ३०,००० | ५,४०० | ३५,४०० |
| | टिव्हीसी | | TVC - ६० Sec.-As per DAVP rate | ७,००,००० | १ | ७,००,००० | १,२६,००० | ८,२६,००० |
| | जिंगल्स/स्पॉट | | Audio jingle (६० Sec.) | ४५,००० | ४ | १,८०,००० | ३२,४०० | २,१२,४०० |
| | | | | | Total - A | ९,१०,००० | १,६३,८०० | १०,७३,८०० |
| जाहिरात प्रसिद्धी तपशील (Details of Advertisement) | | | | | | | | |
| क्र. | Media | मूळ दर, प्रक्रिया | Details | वारंवारिता | संख्या / दिवस | एकूण अंदाजित रक्कम (सर्व करांसहित) | जीएसटी | एकूण अंदाजित रक्कम (सर्व करांसहित) |
| | इलेक्ट्रॉनिक माध्यमे (वृत्तचित्र शाखा) | | | | | | | |
| १ | स्थानिक लोकल केबल | विहित ई-निविदा प्रक्रियेद्वारे | ४५ ते ६० सेकंदाच्या जाहिरातीचे प्रसारण -सदर माध्यमाद्वारे प्रसिद्धी करण्याकरिता DAVP दर उपलब्ध नाहीत. तथापि, दि.१८ डिसेंबर, २०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये एकलस्त्रोत संस्था आणि जुने / सद्यस्थितीतील व सममाध्यमांचे DAVPदराने आणि लोकल केबलद्वारे जाहिरात प्रसिद्धीसाठी जुन्या DAVP दरास मान्यता देण्यात आलेली आहे. सदर माध्यमांद्वारे प्रसिद्धी करिता शासन निर्णय दि.२३.११.२०२३ मधील संस्थांच्या सुचीमधील संस्थांमार्फत विहित कार्यपद्धतीचे अवलंब करुन प्रसिद्धी करणे शक्य होईल. | नमूद अंदाजित रकमेच्या मर्यादेत | ३० दिवस | ८५,००,००० | १५,३०,००० | १,००,३०,००० |
| २ | एसटी बस डेपोतील सार्वजनिक उदघोषणा | CBC (DAVP) दर | राज्यातील एस.टी. बसस्थानकावरुन ऑडिओ जिंगलचे प्रसारण | नमूद अंदाजित रकमेच्या मर्यादेत | ३० दिवस | ४०,००,००० | ७,२०,००० | ४७,२०,००० |
| समाज माध्यमे व डिजीटल माध्यमे (नव माध्यम शाखा) | | | | | | | | |
| १ | सोशल मिडीया | विहित ई-निविदा प्रक्रियेद्वारे | शासन निर्णय दि.२३.११.२०२३ मधील संस्थांच्या सुचीमधील संस्थांमार्फत विहित कार्यपद्धतीचे अवलंब करुन प्रसिद्धी करणे शक्य होईल. या माध्यमांच्या संस्थेनी निविदेमध्ये नमूद केलेल्या दराने प्रसिद्धी करण्याचे प्रस्तावित | नमूद अंदाजित रकमेच्या मर्यादेत | ३० दिवस | ८५,००,००० | १५,३०,००० | १,००,३०,००० |

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| २ | डिजिटल मिडीया | विहित ई-निविदा प्रक्रियेद्वारे | शासन निर्णय दि.२३.११.२०२३ मधील संस्थांच्या सुचीमधील संस्थांमार्फत विहित कार्यपद्धतीचे अवलंब करुन प्रसिद्धी करणे शक्य होईल. या माध्यमांच्या संस्थेनी निविदेमध्ये नमूद केलेल्या दराने प्रसिद्धी करण्याचे प्रस्तावित | नमूद अंदाजित रकमेच्या मर्यादेत | ३० दिवस | ८२,००,००० | १४,७६,००० | ९६,७६,००० |
| **बाह्य माध्यमे (प्रदर्शने शाखा)** | | | | | | | | |
| १ | खाजगी होर्डिंग्ज | CBC (DAVP) यादीवरील व दर | भाडे तत्त्वावरील खाजगी होर्डिंग्ज As per Availability. | नमूद अंदाजित रकमेच्या मर्यादेत | | ८५,००,००० | १६,१५,००० | १,०१,१५,००० |
| | Total B | | | | | **३,७७,००,०००** | **६८,७१,०००** | **४,४५,७१,०००** |
| | | | | | | **३,८६,१०,०००** | **७०,३४,८००** | **४,५६,४४,८००** |
| १ | शा.नि. दि.१३.०८.२०२१ नुसार रु.५.०० कोटी इतक्या रक्कमेपर्यंतच्या प्रसिद्धी आराखड्यासाठी एकूण खर्चाच्या ४% (रु.२० लाख) आणि त्यापेक्षा प्रत्येक वाढीव रक्कमेसाठी २% (उर्वरित रक्कमेवर (रु.५ कोटी वजा जाता)) प्रमाणे | शासन निर्णय तरतुदीनुसार | माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाला येणारा कार्यालयीन उपकरणावरील खर्च, सॉफ्टवेअर, तात्पुरता मनुष्यबळावरील खर्च, संशोधन खर्च, वाहतूक खर्च, इतर किरकोळ खर्च | | | १५,४४,४०० | | १५,४४,४०० |
| | TOTAL EXPENDITURE | | | | | ४,०१,५४,४०० | | ४,७१,८९,२०० |

३. प्रस्तुत बाबीकरिता होणारा खर्च लेखाशिर्ष “मागणी क्र. एम-३, ३४५१, सचिवालयीन आर्थिक सेवा, ०९०, सचिवालय, (००) (०६), सार्वजनिक वितरण व्यवस्थेचे संगणकीकरण (राज्य योजना) (कार्यक्रम), (३४५१A०७३)-१७ संगणक खर्च” मध्ये उपलब्ध तरतुदीतून सन २०२४-२५ करिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाने यानुषंगाने संबंधित जाहिरात एजन्सी/आस्थापनांना कार्यादेश देण्याबाबत पुढील कार्यवाही करावी. प्रस्तुत प्रचार व प्रसिद्धी कार्यक्रम राबविण्यासाठी खर्च करतांना शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय / आदेश/परिपत्रके यानुसार तसेच वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये निर्गमित नियम पुस्तिका १९७८ मधील तरतूदींचे/ अटी व शर्तीचे काटेकारपणे पालन करण्यात यावे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२४०८१४१७४३०६६९०६ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SANTOSH UMESHRAO GAIKWAD

Digitally signed by SANTOSH UMESHRAO GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT,
2.5.4.20=1d60828c41033ab1da6d64ef17879745d578b334c05c1e8151ef933f134060bc,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=BC8833F9E213A7E4DFB9D2B071C9202EA52A04054E53B0C1BBF9E50C90A2CF5C, cn=SANTOSH UMESHRAO GAIKWAD
Date: 2024.08.14 17:57:57 +05'30'

**(संतोष गायकवाड)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा. विरोधी पक्षनेते (विधानसभा / विधान परिषद), महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२. सर्व सन्मानीय विधानसभा / विधान परिषद सदस्य,

३. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. मा. उपमुख्यमंत्री (नियोजन व वित्त) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
६. मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई,
७. मा. मंत्री, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव,
८. सर्व विभागीय आयुक्त,
९. सर्व जिल्हाधिकारी (मुंबई शहर व उपनगर वगळून),
१०. नियंत्रक शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा मुंबई,
११. नियंत्रक, वैधमापनशास्त्र, मुंबई,
१२. वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई,
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर,
१४. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
१५. अधिदान व लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१६. अधिदान व लेखा अधिकारी मुंबई
१७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी ,मुंबई
१८. वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
१९. सर्व उप आयुक्त (पुरवठा),
२०. सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी,
२१. सर्व अन्न धान्य वितरण अधिकारी
२२. सर्व उपनियंत्रक (शिधावाटप) मुंबई/ठाणे
२३. निवडनस्ती (संगणक कक्ष).